**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१८ / प्र. क्र. १९६ / १८ ( र. व का .)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ डिसेंबर, २०१८

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण १०९९ / १२२० / १८ (र. व का.), दिनांक २८ जुलै, २०००.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण २०१६ / प्र. क्र. १८३ / १८ (र. व का.), दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण २०१६ / प्र. क्र. १८३ / १८ (र. व का.), दिनांक २३ जून, २०१७.

**शासन परिपत्रक :-**

शासकीय अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवानिवृत्तीनंतर त्यांना कायमस्वरुपी ओळखपत्र देण्याबाबत मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तथापि सेवानिवृत्त अधिकारी / कर्मचाऱ्यास नेमक्या कोणत्या विभाग / कार्यालयाकडून ओळखपत्र मिळणे अपेक्षित आहे, याबाबत अनेक विभागांकडून या विभागास विचारणा होत असते. सबब यासंदर्भात खालीलप्रमाणे नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करावी.

अ) सर्वसाधारणपणे संबंधित अधिकारी / कर्मचारी ज्या विभाग / कार्यालयातून सेवानिवृत्त झाला आहे, त्या विभाग / कार्यालयाने ओळखपत्र देण्याची कार्यवाही करावी.

आ) संबंधित अधिकारी / कर्मचारी जर प्रतिनियुक्तीच्या पदावरून सेवानिवृत्त झाला असेल, तर त्याच्या मूळ विभाग / कार्यालयाने ओळखपत्र द्यावे.

इ) लेखा अधिकारी / सांख्यिकी अधिकारी यांसारख्या अन्य विभाग / कार्यालयांमध्ये कार्यरत असणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना त्यांच्या मूळ विभागांनी ( याबाबतीत लेखा व कोषागारे संचालनालय / अर्थ व सांख्यिकी संचालनालय) ओळखपत्र देण्याची कार्यवाही करावी.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१८१२३११६५७५२४००७ असा आहे. तसेच डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by Samridhi V. Angolkar
Date: 2018.12.31 17:03:37 +05'30'

**( समृद्धी अनगोळकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव ( ५ प्रती ) (पत्राने),

२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव ( ५ प्रती ), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य,
६. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई, ( पत्राने ),
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
८. मा. महाअधिवक्ता, मा. उच्च न्यायालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. प्रधान महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
१०. प्रधान महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
११. प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
१२. प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
१३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१४. महाप्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय, मुंबई,
१५. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय ( मूळ शाखा ), मुंबई,
१६. प्रबंधक, मा. लोकायुक्त व मा. उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई,
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, ( पत्राने ),
१८. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१९. मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
२०. सर्व विभागीय आयुक्त,
२१. सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२३. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /
२४. प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
२८. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
२९. निवड नस्ती ( कार्यासन १८ ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.